**“स्वराज्य रक्षक धर्मवीर छत्रपती संभाजी महाराज यांचे बलिदान स्थळ मौजे तुळापूर, ता.हवेली व समाधी स्थळ स्मारक वढु (बु.) ता.शिरुर, जि.पुणे”विकास आराखडयास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-तिक्षेवि-२०२३/प्र.क्र.९६/का.१४४४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : २३ जुलै, २०२४

**वाचा :** नियोजन विभाग शासन निर्णय क्र. अनिवि-२०२१/प्र.क्र.८२/का.१४४४, दि.२८.०६.२०२२

**प्रस्तावना :**

वाचा येथील क्र.१ अन्वये रु.२६९२४.३४ लक्ष इतक्या किंमतीच्या “स्वराज्य रक्षक छत्रपती संभाजी महाराज यांचे बलिदान स्थळ मौजे तुळापूर, ता.हवेली व समाधी स्थळ स्मारक वढु (बु.), शिरुर, जि.पुणे” विकास आराखडयास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयातील परिशिष्ट-अ मधील अ.क्र.६ मध्ये “वरील कामाकरीता कर व इतर खर्च” या बाबीकरीता १२% वस्तू व सेवा कर विचारात घेण्यात आला होता. वस्तू व सेवा कर १२% वरुन १८% करण्यात आल्याने रु.१२९९.९१ लक्ष इतकी वाढ झाल्याने सदर आराखडयाची एकूण किंमत रु.२८२२४.२५ लक्ष इतकी झाली आहे. या सुधारित आराखडयास मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

नियोजन विभाग, शासन निर्णय दि.२८.०६.२०२२ मधील परिशिष्ट-अ मधील अ.क्र.६ मध्ये “वरील कामाकरीता कर व इतर खर्च” या बाबीकरीता १२% वस्तू व सेवा कर विचारात घेण्यात आला होता. वस्तू व सेवा कर १२% वरुन १८% करण्यात आल्याने रु.१२९९.९१ लक्ष इतकी वाढ झाली आहे. आता रु.२८२२४.२५ लक्ष इतक्या किंमतीच्या “स्वराज्य रक्षक धर्मवीर छत्रपती संभाजी महाराज यांचे बलिदान स्थळ मौजे तुळापूर ता.हवेली व समाधी स्थळ स्मारक वढु (बु.) ता.शिरुर, जि.पुणे” विकास आराखडयास व्यय अग्रक्रम समितीने नमूद केलेल्या खालील अटींच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

अ. सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेतच काम पूर्ण करण्याची दक्षता घेण्यात यावी.

ब. योजनेची अंमलबजावणी करताना प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीय मर्यादा, विहित निविदा कार्यपध्दती अनुसरणे, आवश्यकतेनुसार राज्य तांत्रिक सल्लागार समितीने प्रकल्पाच्या व कामाच्या अनुषंगाने दिलेल्या निदेशांचे व त्रुटींची पुर्तता करणे याची सर्वस्वी जबाबदारी अंमलबजावणी यंत्रणेची राहील.

क. सदर सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी, निविदाविषयक क्षेत्रिय निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहित धरली जाणार नाही. अशा प्रकारची तपासणी त्यावेळच्या प्रचलित शासन नियमानुसार करण्याची जबाबदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेची राहील.

२. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२९७/व्यय-८, दि.०२.०५.२०२४ व व्यय अग्रक्रम समितीने दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर आराखडयातील कामांवर येणारा खर्च "मागणी क्र. ओ-१० मुख्य लेखाशीर्ष ५४५२ पर्यटनावरील भांडवली खर्च, ५३-मोठी बांधकामे, (००) (१४) (५४५२ ०२०२) कार्यक्रम" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७२३१५०८३४७२१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MILIND RAGHUNATH KULKARNI

Digitally signed by MILIND RAGHUNATH KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DB6FB8A1DB6A8793024B0C8728EB79AB35DD0CAE14DDA9621D73EA4347C7856A, cn=MILIND RAGHUNATH KULKARNI
Date: 2024.07.23 15:20:16 +05'30'

**( मिलिंद कुळकर्णी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत, तातडीच्या आवश्यक कार्यवाहीकरिता,
जिल्हाधिकारी,पुणे.

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री हयांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मुंबई.
४. मा.राज्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मुंबई.
५. मा.मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव (सर्व)
६. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. मा.संसद सदस्य/विधानसभा/विधानपरिषद सदस्य (सर्व)
८. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
९. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (सर्व)
१०. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई.
११. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य-२, नागपूर.
१२. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३. महाव्यवस्थापक, मध्य रेल्वे, मुंबई.
१४. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
१५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे.
१६. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे.
१७. मुख्य अभियंता, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, पुणे.
१८. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे.
१९. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, पुणे.
२०. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालय संचालनालय, मुंबई.
२१. उप संचालक, पुरातत्व विभाग, येरवडा, पुणे.
२२. निवडनस्ती (का.१४४४-अ), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.